जल जीवन मिशन अंतर्गत विशेष घटक कार्यक्रम (राज्य हिस्सा) खाली राज्य पाणी व स्वच्छता मिशनला निधी वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ ए०९७)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बजेट-२०२४/प्र.क्र.३६७/पापु-१०**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ०९ ऑगस्ट, २०२४

वाचा-

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०**
२. **सह सचिव, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.G-११०११/२/२०२३-JJM-I-DDWS, दि. २८.०३.२०२४**
३. **अवर सचिव, राष्ट्रीय जल जीवन मिशन, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र. W-११०२०/१९७/२०१५-Water-I/१४, दि. १२.०७.२०२४**

प्रस्तावना-

राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना संदर्भाधिन क्र. १ अन्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध १:१ आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाकरीता विशेष घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) लेखाशीर्ष २२१५ ए०९७ अंतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.५७७.५० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे.

जल जीवन मिशन अंतर्गत राज्याकरीता सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाकरीता काल्पनिकरित्या एकूण रू. ५३५२.९३ कोटी (केंद्र हिस्सा) इतके नियतव्ययाची तरतूद केले असल्याबाबत संदर्भाधिन क्र. २ अन्वये कळविले आहे. त्यापैकी केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र.३ अन्वये सन २०२४-२०२५ वित्तीय वर्षातील प्रथम हप्ता रू. २६७६.४६५० कोटी मधील प्रथम भाग (First Tranche of First Installment) म्हणून रु.८०२.९३९५ कोटी इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW खात्यात उपलब्ध करुन दिला आहे. त्यामध्ये विशेष घटक कार्यक्रमाखालील रू. ९९.०४४७ कोटीचा समावेश आहे.

जल जीवन मिशन अंतर्गत विशेष घटक कार्यक्रमाखाली केंद्र हिस्सा रू. ९९.०४४७ कोटी निधीस समरुप राज्य हिश्श्याकरीता रु. ९९.०४४७ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यामुळे जल जीवन मिशन अंतर्गत विशेष घटक कार्यक्रम राज्य हिश्श्याखाली रु. ९९.०४४७ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षामध्ये विशेष घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) "मागणी क्र. एन-०३, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, ७८९, अनुसुचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१), अनुसुचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०२) जल जीवन मिशन (राज्य हिस्सा ५० टक्के)(कार्यक्रम) (२२१५ ए०९७)" या लेखाशीर्षांतर्गत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु. ९९.०४४७ कोटी (अक्षरी- रु. नव्याण्णव कोटी चार लक्ष सत्तेचाळीस हजार

फक्त) इतका निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code-HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code-HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

४. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.२५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीयुडी-२०२४/प्र.क्र.६९/अर्थसंकल्प (विघयो), दि.०६.०८.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०९१६२८०३९७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2024.08.09 18:16:01 +05'30'

(रविंद्र भराटे)
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उप सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०